राज्यातील वस्त्रोद्योग ग्राहकांना वीज दरात सवलत दिल्यामुळे महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना द्यावयाचे अर्थसहाय्य (रोखीने) सन २०२१-२२.

**महाराष्ट्र शासन**
**ऊद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र. बीयुडी-२०२१/प्र.क.५२/ऊर्जा-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : - १६ नोव्हेंबर, २०२१

**संदर्भ** :-

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक अर्थस-२०२०/प्र. क्र. ६५/अर्थ-३, दिनांक ०४ मे, २०२०
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक अर्थस-२०२१/प्र. क्र. ४८/अर्थ-३, दिनांक ०६ एप्रिल, २०२१
३) महावितरण कंपनीचे पत्र क्र. पी-कॉम/शासन/मागणी/सवलत/१००४३, दिनांक १८ मे, २०२१.
४) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक अर्थस-२०२१/प्र. क्र. ४८/अर्थ-३, दिनांक २४ जुन, २०२१
५) शासन निर्णय, ऊद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.बीयुडी-२०२१/प्र.क.५२/ऊर्जा-३, दिनांक २९ जुन, २०२१

**प्रस्तावना** :-

राज्यातील वस्त्रोद्योग ग्राहकांना शासनाच्या धोरणानुसार महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादितकडून  वीज दरात सवलत देण्यात येते व त्याची प्रतिपूर्ती शासनाकडून महावितरण कंपनीस केली जाते.  महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनीस वस्त्रोद्योग ग्राहकांना अर्थसहाय याकरिता वित्तीय वर्ष २०२१-२२ मध्ये मागणी क्रमांक के-६ मुख्य लेखाशिर्ष २८०१५५९९ या लेखाशीर्षाखाली रू.३००.०० कोटीची अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आली आहे. सदर तरतूदीमधून उपरोक्त संदर्भ क्र. ५ च्या शासन निर्णयान्वये महावितरण कंपनीस रोखीने रू. २०७.०० कोटी अर्थसहाय्य उपलब्ध करून देण्यात आले आहे. आता वित्त विभागाने मान्यता दिल्यानुसार महावितरण कंपनीस रोखीने रू. ९३.०० कोटी अर्थसहाय्य उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

वस्त्रोद्योग ग्राहकांना वीज दरात दिलेल्या सवलतीसाठी महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना देय असलेली अर्थसहायाची रक्कम रू. ९३.०० कोटी (रुपये त्र्याण्णव कोटी फक्त) रोखीने वितरीत करण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर निधी ज्या कारणासाठी मंजूर करण्यात आला त्याच कारणासाठी खर्च करण्याची दक्षता महावितरण कंपनीने घ्यावी.

३. उक्त प्रयोजनासाठी होणारा खर्च “मागणी क्रमांक के-६, २८०१ वीज, ०५ पारेषण व वितरण, १०४, वीज विकास व्यवस्था राष्ट्रीय भार, (०१) वीज दरात सवलत, (०१) (०३) वस्त्रोद्योग ग्राहकांना वीजदर सवलत (सर्वसाधारण) (२८०१५५९९), (कार्यक्रम) ३३ अर्थसहाय्य” या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व तो सन २०२१-२२ या वित्तीय वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

४. सदर रक्कम अधिदान व लेखा अधिकारी मुंबई यांचेमार्फत कोषागारातून काढून महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, मुंबई यांना अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्री. ना. रा. ढाणे,

अवर सचिव (उर्जा-३) आणि नियंत्रण अधिकारी म्हणून श्री. उ. द. वाळुंज, सह सचिव (उर्जा-३), उद्योग,उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. त्यांनी महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, मुंबई यांना मंजूर झालेली रक्कम रू. ९३.०० कोटी (रुपये त्र्याण्णव कोटी फक्त) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई येथून आहरित करुन महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, मुंबई यांचे नावे स्वतंत्ररीत्या धनादेश काढून/RTGS द्वारे वितरीत करण्याची कार्यवाही करावी.

५. यंत्रमाग ग्राहकांना वीज बीलात सवलतीसाठी महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनीला निधी वितरीत करतांना वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक अर्थस-२०२१/प्र. क्र. ४८/अर्थ-३, दिनांक २४ जुन, २०२१ च्या परिशिष्टातील तपासणी अटीची पूर्तता होत आहे.

६. या लेखाशीर्षाखाली निधी वितरीत करण्यासाठी सादर करण्यात आलेल्या देयकाच्या अनुषंगाने प्रमाणित करण्यात येते की, या लेखाशीर्षाखाली कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही तसेच उपयोगिता प्रमाणपत्र प्रलंबित नाही. सदर शासन निर्णय, नियोजन विभागाच्या मान्यतेने व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. २५३/२०२१/व्यय-१६, दिनांक ११.११.२०२१ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२१११११६१७१५५४५०१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NANASAHEB RAJARAM DHANE

Digitally signed by NANASAHEB RAJARAM DHANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a71698611123263cde9d32423e9bb73044d91ed0cffad3b6267198ee5014159f, pseudonym=5DD23ACB82750B55FAC0D076A47198885E07A4B6, serialNumber=6C39E2858150DBDFCFE6CD25ED08ADF59F4D2FD8C1EDE1730735F604904BF3BB, cn=NANASAHEB RAJARAM DHANE
Date: 2021.11.16 17:18:28 +05'30'

**( ना. रा. ढाणे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत:-**

१) अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सूत्रधारी कंपनी मर्यादित ,हाँगकाँग बँक बिल्डिंग, फोर्ट, मुंबई
२) अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, प्रकाशगड, वांद्रे मुंबई ४०००५१
३) सचिव महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, १३ वा मजला, वर्ल्ड ट्रेड सेंटर, कुलाबा, मुंबई १
४) मा. विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद /विधानसभा, विधानभवन, मुंबई ३२
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई ४०००२०
६) महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई ४०००२०
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर,
८) अधिदान व लेखा अधिकारी,रालेवि/अराप, मुंबई ४००००१
९) अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, वांद्रे पूर्व, मुंबई ४०००५१
१०) उप सचिव (ऊर्जा-५), उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई --३२
११) वित्त विभाग, अर्थसंकल्प-१४, व्यय-१६, मंत्रालय, मुंबई-४०००३२
१२) मुख्य विद्युत निरीक्षक, उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, ३ रा मजला, प्रशासकीय इमारत, रामकृष्ण चेंबूरकर मार्ग, चेंबूर मुंबई.
१३) निवडनस्ती (ऊर्जा-३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२.